उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्था यांमधील कनिष्ठ अधिव्याख्याता (गट-ब) या पदाच्या सन २०२० मधील विनंती बदल्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली-२०२०/प्र.क्र. ६८/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० सप्टेंबर, २०२०.

## आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(५) मध्ये विहीत केलेल्या तरतूदीस अनुसरुन उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील कनिष्ठ अधिव्याख्यात्यांच्या खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे परिणामस्वरूपत: (Resultant) बदल्या करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | कनिष्ठ अधिव्याख्यात्यांची नावे | विषय | सध्या कार्यरत असलेले महाविद्यालय/संस्था | बदलीचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. अतुल वासुदेव धाबळे | अर्थशास्त्र | एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई | सिडनहॅम महाविद्यालय, मुंबई | विनंती |
| २ | श्री. डी. पी. देशमुख | इंग्रजी | शासकीय ज्ञान विज्ञान महाविद्यालय, औरंगाबाद | एलफिन्स्टन महाविद्यालय, मुंबई | विनंती |

२. विनंती बदली झालेल्या कनिष्ठ अधिव्याख्यात्यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

३. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मंजूरीने सदर बदल्या करण्यात येत आहेत.

४. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरीता संबधित महाविद्यालयाचे/ संस्थेचे प्राचार्य/संचालक यांनी खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. आदेश तात्काळ अंमलात येतील.
२. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या कनिष्ठ अधिव्याख्यात्यांच्या जागी पर्यायी प्राध्यापक हजर होण्याची वाट न पाहता संबंधित प्राचार्य/संचालकांनी बदली झालेल्या कनिष्ठ अधिव्याख्यात्यांना बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच संबंधित कनिष्ठ अधिव्याख्यात्यांनी सध्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेतून त्यांची बदली नंतरची पदस्थापना केलेल्या महाविद्यालयात/ संस्थेत तात्काळ रुजू व्हावे.

३. बदली झालेले कनिष्ठ अधिव्याख्याते संबंधित महाविद्यालय/संस्थेमधून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यानंतर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या कनिष्ठ अधिव्याख्यात्यास रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षा काळ ठरुन काम न करता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित महाविद्यालयाचे/संस्थेचे प्राचार्य/संचालक यांना जबाबदार धरण्यात येईल.

**४.** पदस्थापनेत बदल करण्यासंबधीच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही कनिष्ठ अधिव्याख्यात्याने प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित कनिष्ठ अधिव्याख्याता शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

**५.** बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

६. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे तसेच सदर आदेश तात्काळ अंमलात येत असल्याने बदली झालेल्या कनिष्ठ अधिव्याख्यात्यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे अथवा जास्तीत जास्त **दिनांक १५ ऑक्टोबर, २०२०** पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या महाविद्यालयाने/ संस्थेने काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या महाविद्यालयाकडून/ संस्थेकडून काढण्यात येऊ नये. सदर वेतन संबंधित कनिष्ठ अधिव्याख्याता बदलीच्या महाविद्यालयात/ संस्थेत रुजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या महाविद्यालयाने/संस्थेने काढावे. **दिनांक १६ ऑक्टोबर, २०२०** पासूनचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या महाविद्यालयातील/ संस्थेतील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल.

७. बदली झालेल्या कनिष्ठ अधिव्याख्यात्यांना तात्काळ कार्यमुक्त करण्याची जबाबदारी वैयक्तिकरित्या सबंधित महाविद्यालयाचे/संस्थेचे प्राचार्य/संचालक यांची राहील. याबाबतचा कार्यपालन अहवाल संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी **दिनांक १६ ऑक्टोबर**, **२०२०** पूर्वी शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९३०१६०८४४६४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANISHA PRAVIN KINI

Digitally signed by MANISHA PRAVIN KINI
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=108cbdac08c7e940866a8fc97bfe7f861bf192ce9dd6b4d0924623149a51f9ed, serialNumber=be59abce2e8b3a2f8b88d3cb21bee92fd81e2ed85d5357c0a88629268305fca7, cn=MANISHA PRAVIN KINI
Date: 2020.09.30 16:10:59 +05'30'

**(म.प्र.किणी)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२. संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
३. संबंधित प्राचार्य/संचालक,शासकीय महाविद्यालये/संस्था
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. संबंधित कनिष्ठ अधिव्याख्याता
८. निवड नस्ती.

**प्रत** :- १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव